नाशिक जिल्हा परिषदेच्या विस्तारीत
प्रशासकीय इमारत बांधकामाच्या
उपकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.जिपई २०१०/प्र.क्र.६३/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २जुलै,२०१०

संदर्भ:-मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नाशिक यांचे पत्र क्र.जिपना/बांखा/इवद/१/१२४,दि.११.३.२०१०

प्रस्तावना :-

मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नाशिक यांनी संदर्भीय दिनांक ११.३.२०१० च्या पत्रान्वये नाशिक जिल्हा परिषदेच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीत फर्निचर इतर उपकामास प्रशासकीय मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

नाशिक जिल्हा परिषदेची जुनी प्रशासकीय इमारत अपुरी पडत असल्यामुळे तसेच जिल्हा परिषदेच्या कामकाजात मोठया प्रमाणात वाढ झालेली असुन, अधिनस्थ विखुरलेली अन्य कार्यालये एकाच प्रशासकीय इमारतीत आणण्याच्या व जनतेच्या सोयीच्या दृष्टीने अस्तित्वातील इमारतीलगत विस्तारीत प्रशासकीय इमारतीचे मूळ बांधकाम जिल्हा परिषदेने स्व:निधीतून पूर्ण केले आहे. या करीता जिल्हा परिषदेने स्व:निधीतून मूळ बांधकामावर रु.१४०.०० लक्ष खर्च केला आहे. मात्र, सदर विस्तारीत इमारत कार्यान्वित करण्याच्या दृष्टीने अंतर्गत सजावट, फर्निचर, कंम्पाऊड वॉल, जमिन सपाटीकरण, आग प्रतिबंधक सुविधा, जल:पुनर्भरण सुविधा इ. एकूण रु.१८५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीची उपकामे बाकी असून, त्या करीता जिल्हा परिषदेला स्वनिधीतून निधी उपलब्ध करुन देणे शक्य होत नाही. त्यामुळे जिल्हा परिषदेच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीचे उर्वरीत कामे पूर्ण करुन घेण्याकरीता शासनाने निधी उपलब्ध देण्याबाबत जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेने दिनांक १५.२.२०१० च्या सर्वसाधारण सभेत ठराव पारित केला असून, त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., नाशिक यांनी विस्तारीत इमारत बांधकामाचे सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत रु.१८५.०० लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक उप अभियंता, जिल्हा परिषद (बांध.) उप विभाग, नाशिक यांनी तयार केले असुन, कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद नाशिक, यांनी साक्षाकिंत केले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., नाशिक यांनी प्रस्तावासोबत कामाचे सविस्तर अंदाजपत्रक, ठरावाची प्रत, साईट प्लॅन, सात बारा उतारा इ.कागदपत्रे सादर केलेली आहेत.

मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प., नाशिक यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, एकूण रु. १,८१,३०,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या नाशिक जिल्हा परिषदेच्या विस्तारीत इमारतीच्या उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

नाशिक जिल्हा परिषदेच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीच्या ठिकाणी एकूण रक्कम रुपये-१,८१,३०,०००/- (अक्षरी रक्कम रुपये एक कोटी एक्याऐंशी लक्ष तीस हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या उप कामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/ इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर /मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/ अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन प्रस्तुत विस्तारीत इमारतीमधील फर्निचरचे काम करुन घेणे बंधनकारक राहील.

(२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

(३) या कामी प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

(५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

२. नाशिक जिल्हा परिषदेच्या विस्तारीत प्रशासकीय इमारतीच्या उपकामाच्या सविस्तर अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| GENERAL ABSTRACT OF SUB WORK AT NASIK Z.P.AMDN. EXTN. BUILDING | | |
|---|---|---|
| **Sr.** | **Work Details** | **Amount (in Rupees)** |
| 1. | Cost of Interior & Furniture Work | 7361025.00 |
| 2. | Additional Work | |
| | (i) Cooling System | 2554840.00 |
| | (ii) Acoustical System | 850000.00 |
| | (iii) Sound System | 880000.00 |
| | (iv) Electrification | 1050000.00 |
| | (v) LCD Projector | 100000.00 |
| | (vi) Colouring & Polishing | 360000.00 |
| | Total | 13155865.00 |
| 3. | Add for 4 % Contengency | 526235.00 |
| 4. | Compound Wall | 1420999.00 |
| 5. | Ground Leveling & Pevar Blocks | 1526372.00 |
| 6. | Fire Fighting Instalation | 1000000.00 |
| 7. | Rain Water Harvesting Provision | 500000.00 |
| | Total Rs. | 18129471.00 |
| | Say | Rs.1,81,30,000.00 |

३. उपरोक्त कामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. या कामी मुख्य अभियंता, सा.बां.वि. किंवा मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.,कॅम्प ऑफिस, पुणे यांच्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेवून, त्याची प्रत शासनास सादर करावी.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, २९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ. क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२०१००७०२१४२४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त नाशिक विभाग, नाशिक
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नाशिक.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नाशिक
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नाशिक
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नाशिक
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नाशिक विभाग, नाशिक
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक
१०) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१३) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई